पुरभिलेख संचालनालय, मुंबई,
राज्यस्तरीय छाननी समितीचे पुर्नगठन
करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
शासन निर्णय क्रमांक-मुपवि-२०१५/प्र.क्र.७६/सां.का.२
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २६ जून, २०१५.

वाचा :- (१) शासन निर्णय क्रमांक : मपुवि- २०११/२५४१/प्र.क्र.५६/सांका-२ दि.२४.०२.२०११.
(२) संचालक, पुराभिलेख संचालनालय, यांचे पत्र क्रमांक: एसएससी-५०१५/२२२७ दि. १०.०६.२०१५

**शासन निर्णय :**

राज्यातील अनेक संस्था, संघटना, महाविद्यालये, विद्यापीठे, ग्रंथालये, वस्तुसंग्रहालये व खाजगी व्यक्ती यांच्याकडे राष्ट्रीयदृष्टया महत्वाची कागदपत्रे आहेत. सदर महत्वाच्या व दुर्मिळ कागदपत्रे/पुस्तके यांचे जतन करण्यासाठी राष्ट्रीय पुरालेखागार, भारत सरकार, नवी दिल्ली यांच्याकडून अर्थसहाय्य केले जाते. याबाबतच्या प्रस्तावांची छाननी, तपासणी करण्यासाठी राज्यस्तरीय छाननी समितीचे (State Level Screening Committee) गठन संदर्भ क्र. १ येथील दि. २४.०२.२०११ च्या शासन निर्णयान्वे करण्यात आले होते. सदर समितीचा कालावधी संपुष्टात आला असल्याने या समितीचे पुर्नगठन करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

२. आता शासन राज्यस्तरीय छाननी समितीचे पुर्नगठन करण्यास मान्यता देत आहे. या समितीची रचना खालीलप्रमाणे असेल.

| | | |
|---|---|---|
| १ | सचिव/ प्रधान सचिव/ अ.मु.स. , सांस्कृतिक कार्य. | अध्यक्ष. |
| २ | डॉ. मंजिरी कामत, इतिहास विभाग प्रमुख, मुंबई विद्यापीठ. | अशासकीय सदस्य. |
| ३ | प्रा. डॉ. भावना पाटोळे, इतिहास विभाग प्रमुख, एलफिन्स्टन कॉलेज, मुंबई. | अशासकीय सदस्य. |
| ४ | श्री. अ.का.खराडे, सेवानिवृत्त अभिलेखाधिकारी, पुराभिलेख संचालनालय, मुंबई. | अशासकीय सदस्य. |
| ५ | संचालक, पुराभिलेख संचालनालय, मुंबई. | सदस्य सचिव. |

३. राज्यस्तरीय छाननी समितीवर सदस्य नियूक्तीचा कालावधी ३ वर्षे किंवा शासनाचे पुढील आदेश यापैकी जो कालावधी अगोदरचा असेल तो पर्यंत असेल. या समितीचे कार्यक्षेत्र महाराष्ट्र राज्य असेल. या समितीच्या एका आर्थिक वर्षात किमान एक अथवा आवश्यकतेनुसार जादा बैठका होतील.

४. या राज्यस्तरीय समितीचे कार्य खालीलप्रमाणे असेल :-

(अ) राष्ट्रीय पुरालेखागार, भारत सरकार, नवी दिल्ली यांच्या अर्थसहाय्य योजनेसाठी ( Grant-in-aid Scheme of National Archives of India) समितीच्या कार्यक्षेत्रातील विविध अशासकीय संघटना, संस्था, व्यक्ती यांचेकडून येणारे अर्ज/प्रस्ताव स्विकारणे.

(ब) सदर अर्ज/ प्रस्तावांच्या सर्वसाधारण बाबीं बरोबर पुढील बाबींची खात्री करुन घेण्यासाठी तपासणी करणे-

(१) अर्ज/ प्रस्ताव अर्थसहाय्य योजनेच्या निकषांची पुर्तता करतो किंवा कसे?

(२) अर्ज करणा-या संघटना/संस्था/व्यक्ती यांची वर्तमान स्थिती आणि त्यांच्याकडील कोषामधून योजनेसाठी अनुरुप अर्थिक सहभाग करण्याची क्षमता तपासणे.

(३) प्रस्ताव/प्रकल्पाचे महत्व आणि सुसाध्यता तपासणे.

(क) हस्तलिखित/दुर्मिळ पुस्तके यांच्या जतनासाठी राष्ट्रीय पुरालेखागाराच्या आर्थिक मदतीच्या योजने अंतर्गत असलेल्या छाननी समिती पुढे शिफारस/ निरीक्षण विहीत नमून्यात सादर करणे.

५. राज्यस्तरीय छाननी समितीच्या अशासकीय सदस्यांना प्रवास भत्ता, दैनिक भत्ता शासनाच्या त्या त्या वेळी लागू असणा-या प्रचलित आदेशानुसार अनुज्ञेय राहिल. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. झेडडी २, २२०५, कला व संस्कृती (००) १०४ पुराभिलेख (०१) (०२) पुराभिलेख कार्यालये (२२०५ १७९५) १३ -कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षातंर्गत प्राप्त होणा-या त्या त्या वर्षाच्या मंजूर निधीतून भागविण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०१५०६२६१५०८१७७०२३ असा आहे. हा शासन निर्णय डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Basawaraj G Saidanawaru

Digitally signed by Basawaraj G Saidanawaru
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism & Cultural Affairs, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Basawaraj G Saidanawaru
Date: 2015.06.26 17:30:48 +05'30'

**(ब. गु. सैदानवरु)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक,पुराभिलेख संचालनालय, मुंबई.
२. महालेखापाल,महाराष्ट्र-१(लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे विशेष कार्य अधिकारी.

६. सर्व विभागीय आयुक्त.

७. सर्व जिल्हाधिकारी.

८. महासंचालक, राष्ट्रीय अभिलेखागार, भारत सरकार, जनपथ, नवी दिल्ली ११० ००१.

९. सह सचिव, राष्ट्रीय अभिलेखागार, भारत सरकार, जनपथ, नवी दिल्ली ११० ००१.

१०.सर्व समिती सदस्य ( व्दारा :- संचालक, पुराभिलेख संचालनालय, मुंबई )

११.निवड नस्ती, सां.का.२.